श्रीसंत गाडगेबाबा यांची कर्मभूमी ऋणमोचन ता. भातुकली, जि.अमरावती या तीर्थक्षेत्राच्या विकास आराखडयांतील कामास प्रशासकीय मान्यता देऊन निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

## ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः तिर्थवि-२०१८/प्र.क्र.२०९/योजना-६
बांधकाम भवन, २५ मर्झबान मार्ग,
फोर्ट, मुंबई-४०० ००१
तारीखः १४ फेब्रुवारी, २०१९.

**वाचा :-**

१) जिल्हाधिकारी, अमरावती यांचे पत्र क्र मांकः जिनिस/क्र.९/सांस/आराखडा/ १०४३/२०१६, दिनांक १२ सप्टेंबर, २०१६ अन्वये सादर केलेला प्रस्ताव.
२) नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१५/प्र.क.६/१४४४, दिनांक ४ जून २०१५.
३) मा.मुख्यसचिव यांचे अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या दिनांक ८ जून, २०१७ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.
४) मा.मुख्यमंत्री यांचे अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय शिखर समितीच्या दिनांक २१ ऑगस्ट , २०१८ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

श्रीसंत गाडगेबाबा यांची कर्मभूमी ऋणमोचन ता. भातुकली, जि.अमरावती या तीर्थक्षेत्राच्या विकास आराखडयास निधी उपलब्ध करुन देणे प्रस्तावित होते . त्यानुसार जिल्हाधिकारी , अमरावती यांनी जिल्हास्तरीय समित्यांच्या मान्यतेने श्री श्रीसंत गाडगेबाबा यांची कर्मभूमी ऋणमोचन ता. भातुकली, जि.अमरावती या तीर्थक्षेत्राच्या विकासाचा एकूण रु.१०.२० कोटी इतक्या किंमतीचा आराखडा शासन मान्यतेसाठी सादर केला होता.

२. सदर आराखडयातील एकूण रु. १०१६.३१ लक्ष इतक्या किंमतीच्या कामांच्या प्रस्तावास व खर्चास नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांक तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.६/का-१४४४, दिनांक ४ जून २०१५ मधील तरतूदींनुसार मा . मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीने दि.८/६/२०१७ रोजी व मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय शिखर समितीने दि.२१/८/२०१८ रोजी मान्यता दिली आहे . त्यानुसार सदर आराखडयातील रु. १०१६.३१ लक्ष एवढया अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामांना प्रशासकीय मान्यता देऊन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जिल्हाधिकारी, अमरावती यांनी सादर केलेल्या व राज्यस्तरीय समित्यांनी मान्यता दिलेल्या श्रीसंत गाडगेबाबा यांची कर्मभूमी ऋणमोचन ता . भातुकली, जि.अमरावती या तीर्थक्षेत्राच्या आराखडयातील एकूण रु.**१०१६.३१** लक्ष (रुपये दहा कोटी सोळा लाख एकतीस हजार फक्त) इतक्या निधीच्या खालील कामांना प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे .

| अ.क्र. | कामे | अंदाजपत्रकीय रक्कम (रु. लाखात) | प्रशासकीय मान्यता (रु. लाखात) |
|---|---|---|---|
| १ | श्री क्षेत्र मुदगलेश्वर संस्थान ऋणमोचन पर्यंत जोडमार्गाचे नालीसह कॉक्रिटीकरण करणे. | ३०.०० | ३०.०० |
| २ | श्री क्षेत्र मुदगलेश्वर संस्थान ऋणमोचन यात्रेच्या ठिकाणी कॉक्रिटीकरण करणे | ३०.०० | ३०.०० |
| ३ | श्री क्षेत्र मुदगलेश्वर संस्थान ऋणमोचन यात्रेच्या ठिकाणी महिलांकरिता स्नानगृहाचे बांधकाम करणे. | १०.०० | १०.०० |
| ४ | श्री क्षेत्र मुदगलेश्वर संस्थान ऋणमोचन भव्य प्रवेशद्वार बांधकाम करणे | २०.०० | २०.०० |
| ५ | श्री क्षेत्र मुदगलेश्वर संस्थान ऋणमोचन ते श्री क्षेत्र गाडगेबाबा कर्मभूमी यांना जोडणाऱ्या पूर्णा नदीवर मोठया पुलाचे बांधकाम करणे. | २१०.०० | २१०.०० |
| ६ | श्री क्षेत्र मुदगलेश्वर संस्थान ऋणमोचन महिलांकरिता स्वच्छतागृह बांधकाम करणे | १५.५० | १५.५० |
| ७ | श्री क्षेत्र मुदगलेश्वर संस्थान ऋणमोचन खुले रंगमंचासह बांधकाम करणे. | ६.०० | ६.०० |
| ८ | श्री क्षेत्र मुदगलेश्वर संस्थान ऋणमोचन स्वयंपाक घराचे बांधकाम करणे. | ३०.०० | ३०.०० |
| ९ | श्री क्षेत्र मुदगलेश्वर संस्थान ऋणमोचन येथे मंदीर परिसरात ग्रेनाईट बसविणे व सौदर्यकरणे करणे. | २०.०० | २०.०० |
| १० | श्री क्षेत्र मुदगलेश्वर संस्थान ऋणमोचन येथे येणाऱ्या परिसरातील रस्त्यांची सुधारणा करणे. | ३१५.०० | ३१५.०० |

| | | | |
|---|---|---|---|
| ११ | श्री क्षेत्र मुदगलेश्वर संस्थान ऋणमोचन येथे सुसज्ज प्रवासी निवारा बांधणे | ५.०० | ५.०० |
| १२ | श्री क्षेत्र मुदगलेश्वर संस्थान ऋणमोचन येथून वाहून नेणाऱ्या पूर्णा नदीच्या पात्राचे खोलीकरण व पूर नियंत्रण संरक्षण भिंतीचे बांधकाम करणे. | २००.०० | २००.०० |
| | अपेक्षित भाववाढ १० % | ८९.१५ | ८९.१५ |
| | आकस्मिक खर्च ४ % | ३५.६६ | ३५.६६ |
| | **एकूण किंमत** | **१०१६.३१** | **१०१६.३१** |

३. सदर तीर्थक्षेत्राच्या प्रस्तावास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे .

१. मान्यता देण्यात येत असलेल्या एकूण रकमेच्या ५% बचत करून घनकचरा व सांडपाणी व्यवस्थापन या बाबींवर खर्च करावा.

२. सदर प्रस्तावामध्ये GST ची तरतूद वेगळ्याने केलेली दिसत नाही. सबब मान्यता देण्यात येत असलेल्या रकमेतूनच आवश्यकतेनुसार GST ची तरतूद करावी.

४. ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास योजनेअंतर्गत राज्यातील ग्रामीण तीर्थक्षेत्रांना निधी वितरीत करण्यासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात एकूण रु.१००००.०० (रुपये दहा हजार लाख फक्त) लाख इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे . सदर अर्थसंकल्पीत निधीतून प्रशासकीय मान्यता दिलेल्या निधीपैकी प्रथम टप्प्यात रु .४००.०० लाख (रुपये चार कोटी फक्त) इतका निधी जिल्हाधिकारी, अमरावती यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे.

५. सदर कामांच्या अंदाजपत्रकास सक्षम प्राधिका-यांची तांत्रिक मंजूरी (Sanctioned) असल्याची व बांधकामासाठी लागणारी आवश्यक जागा शासनाच्या मालकीची आहे याची जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील कार्यकारी समितीने खात्री करावी.

६. प्रशासकीय मंजुरी आदेशात समाविष्ट कामांचे स्वरूप लक्षात घेता, ह्या कामांची एकत्रित किंवा वेगवेगळी निविदा प्रक्रिया काढावी याबाबत जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील कार्यकारी समितीने निर्णय घ्यावा . संपूर्ण प्रकल्पाच्या सर्व कामांची एक किंवा जास्त निविदा काढण्यास हरकत नाही. तथापि सदर कामांची निविदा प्रक्रिया राबवितांना अनावश्यक कामांची विभागणी टाळावी.

७. सदर निधी आहरण करुन संबंधित कार्यान्वयीन यंत्रणेला वितरीत करण्यासाठी जिल्हा नियोजन अधिकारी/ सहाय्यक जिल्हा नियोजन अधिकारी, अमरावती यांना आहरण व संवितरण

अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच जिल्हाधिकारी, अमरावती यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

८. सदर कामांचे नियोजन व खर्चाचे सनियंत्रण, नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक तीक्षेवि-२०१५/प्र.क.६/१४४४, दिनांक ४ जुन २०१५ अन्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हा़स्तरीय कार्यकारी समितीकडे सोपविण्यात येत आहे. समितीची कार्यकक्षा शासन निर्णयात नमूद केल्यानुसार राहिल.

९. जिल्हास्तरीय कार्यकारी समितीने कामांच्या अंमलबजावणीसाठी संबंधीत कार्यान्वयीन यंत्रणांशी समन्वय साधावा व कामे विहीत कालावधीत पूर्ण होण्यासाठी आवश्यक त्या उपाययोजना कराव्यात.

१०. सदर कामांच्या अंदाजपत्रकांना सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता असल्याची खात्री करावी. तसेच सदर कामांची देखभाल दुरुस्ती देवस्थान ट्रस्ट /जिल्हापरिषद/ग्रामपंचायत यांनी करावी. त्याचप्रमाणे सांडपाणी ,घनकचरा, इतर कचरा इ. बाबतची कोणतीही अस्वच्छता होणार नाही, याबाबत संस्थानने व सर्व संबंधितानी विशेष दक्षता घ्यावी .

११. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी मागणी क्र . मागणी क्रमांक एल-३-२५१५-इतर ग्राम विकास कार्यक्रम-१९६-जिल्हा परिषद/ जिल्हास्तरीय पंचायतींना सहाय्य (००) (०७) ग्रामीण भागातील तीर्थक्षेत्रांच्या विकासाकरीता अनुदान (रु.२ कोटी ते रु .२५ कोटीपर्यंत) (२५१५२५२१)-३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सदर लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या सन २०१८ -१९ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा. कोणत्याही प्रकारची अनियमितता होणार नाही , तसेच कामे उत्कृष्ट दर्जाची होतील याबाबत सर्व संबंधितांनी दक्षता घ्यावी, याबाबत जिल्हाधिकारी यांनी विशेष काळजी घ्यावी. अन्यथा वसूलीसह कारवाई शासन स्तरावरून केली जाईल .

१२. सदर निधी वितरीत करतांना वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक क्र .अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/ अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल २०१८ मधील अटी व शर्तींचे पालन करण्यात आले आहे.

१३. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक क्र .अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/ अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल २०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

१४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०८१७२३०८२४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

MANOJ DATTATARY JADHAV

Digitally signed by MANOJ DATTATARY JADHAV
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=a83fc829949e9b1a022b031436c946028b48d51f5a1bf36ca3ce4fead857da72, postalCode=400001, street=BHANDHKAM BHAVAN,25 MARZBAN PATH,FORT,MUMBAI, serialNumber=2766afda86350272237dcf9a191545970f7f12e66d0605c664ca2bf0f3001dc0, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=MANOJ DATTATARY JADHAV
Date: 2019.02.18 12:06:23 +05'30'

**(मनोज जाधव)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
२. मा.मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.).यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर
६. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर
७. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रधान सचिव (बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
११. प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मंबई
१२. विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, अमरावती विभाग, अमरावती
१३. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, अमरावती
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती
१५. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद , अमरावती
१६. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अमरावती
१७. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
१८. नियोजन विभाग (का.१४७४/१४४४) मंत्रालय, मुंबई-३२.
१९. वित्त विभाग (व्यय -१५, अर्थसंकल्प-१६/१७), मंत्रालय, मुंबई ३२.
२०. कक्ष अधिकारी, कार्यासन क्र.वित्त-७, वित्त-१, वित्त-८, ग्राम विकास विभाग
२१. निवड नस्ती (का.यो-६). ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.